**प्रशासकीय विभागाने वित्तीय वर्षाच्या समाप्तीनंतर सारसंग्रह प्रसिध्द करण्याबाबत तसेच विभागाद्वारे निर्गमित केले जाणारे शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याबात...**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०२३/प्र.क्र. २४ /१८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २२ मे, २०२३.

**वाचा** : सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मातस/नस्ती-०५/१३२, दि.१६.०४.२००६

**प्रस्तावना** :-

मंत्रालयीन प्रशासकीय विभागांमध्ये शासकीय कामकाज हाताळताना कशा पध्दतीने कामकाज करावे, याबाबात एकत्रित स्वरुपाचे निर्देश अंतर्भूत असलेली “कार्यालयीन कार्यपध्दती नियमपुस्तिका” सामान्य प्रशासन विभागामार्फत तयार करण्यात आली आहे. सदर कार्यालयीन कार्यपध्दती नियमपुस्तिकेतील प्रकरण ९ परिच्छेद ७९ मध्ये प्रत्येक वित्तीय वर्षात निर्गमित करण्यात आलेल्या महत्वाच्या आदेशाचा सारंसग्रह तयार करुन तो अद्यावत करण्याबाबत नमुद केले आहे. सदर सारंसग्रहामध्ये शासन निर्णय, शासन परिपत्रक, शासकीय ज्ञापन सरकारी पत्र यांचा अंतर्भाव करावयाचा आहे. तसेच, महाराष्ट्र शासनाच्या संगणकीकरणाच्या धोरणास अनुसरुन प्रशासनात गतिमानता व पारदर्शकता आणणे तसेच नागरिकांना संगणकाच्या माध्यमातून सुलभ व जलद सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने सामान्य प्रशासन विभागाच्या माहिती व तंत्रज्ञान या उप विभागामार्फत महाराष्ट्र शासनाची www.maharashtra.gov.in ही स्वतंत्र वेबसाईट (संकेतस्थळ) विकसित करण्यात आली आहे. प्रशासकीय विभागामार्फत निर्गमित करण्यात येणारे सर्व शासन निर्णय उक्त संकेतस्थळावर अपलोड करण्याबाबत दिनांक १५.०४.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनिवार्य करण्यात आले आहे. तथापि, सदर दोन्ही बाबींचे पालन होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यानुषंगाने नव्याने सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** -

उपरोक्त तरतुदी विचारात घेता मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभागांनी विभागामार्फत प्रत्येक वित्तीय वर्षात निर्गमित करण्यात आलेल्या महत्वाच्या आदेशांचा वित्तीय वर्षाच्या समाप्तीनंतर तीन महिन्याच्या आत सारसंग्रह तयार करुन अद्ययावत करण्यात यावा. तसेच सदर सारसंग्रह विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात यावा. तसेच प्रशासकीय विभागामार्फत निर्गमित करण्यात येणारे सर्व

शासन निर्णय, शासन परिपत्रके, शासन आदेश इत्यादी www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर नियमितपणे प्रसिध्द करण्यात यावेत. तसेच शासन संकेतस्थळावर प्रसिध्द केल्याशिवाय निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही केल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी वा कोषागार कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्यावर संबंधित कार्यालय प्रमुखांनी शिस्तभंगाची कार्यवाही करावी, अशा सूचना देण्यात येत आहेत. सदर सूचना परिपत्रक निर्गमित केल्याच्या दिनांकापासून त्वरीत अंमलात येतील.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०५२२१५०३२१३१०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJATA MANOJ SAUNIK

Digitally signed by SUJATA MANOJ SAUNIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=04f6ff0d1ef522f4e19358cfac66e30d146fa47249c32a356455a756d05ec1a9, pseudonym=0F4316152AE9704C9E34CC2EF2A8EB14A7151070, serialNumber=F49173DCDA3F795FF41A69777F5A6C2DED24F621CD434ABBB169565D1ABDAA1F, cn=SUJATA MANOJ SAUNIK
Date: 2023.05.22 15:04:10 +05'30'

**(सुजाता सौनिक)**
**अपर मुख्य सचिव ( प्र.सु.र.व का.)**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
६) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे कार्यालय, विधान भवन, मुंबई,
७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
८) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवडनस्ती.